उपजिल्हा रुग्णालय, लोणावळा ता. मावळ जि. पुणे या कार्यालयाकरीता "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आसंअ २०२१/ प्र. क्र. २४४/आ ३अ**

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१. शासन निर्णय क्रमांकः पदनि २०२०/ प्र. क्र. ४४ /आरोग्य ३, दिनांक ०७ जून, २०२१
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये) राज्यस्तर, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-३/टे-७/उजिरु लोणावळा ता. मावळ, पुणे आहरण व संवितरण /नस्ती क्रमांक ७५/१४८३४-३५/२१, दिनांक ०३.०९.२०२१

**प्रस्तावना :-**

उपजिल्हा रुग्णालय, लोणावळा ता. मावळ जि. पुणे या कार्यालयाकरीता "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टामधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-पहिला, अनुक्रमांक ३ येथील नियम- २ अन्वये प्रदान केलेल्या प्राधिकारास अनुसरुन, उपजिल्हा रुग्णालय, लोणावळा ता. मावळ जि. पुणे या कार्यालयाकरीता "वैद्यकीय अधिक्षक" या पदास "कार्यालय प्रमुख" व महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्रमांक १५६ मधील तरतूदीनुसार "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९८/२१ /कोषा.प्रशा-५, दिनांक २१.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२२१३३९१३२९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd76998906ed5012a776fbe5072661d97c2c56c9, pseudonym=BF4C0C742439A64408C0621CD1FF33CD1AD8C6B9, serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF, cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2021.11.22 15:11:13 +05'30'

(दी. नि. केंद्रे)
अवर सचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा - १ , मुंबई
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
६. जिल्हा शल्य चिकित्सक, पुणे
७. वैद्यकीय अधीक्षक, उपजिल्हा रुग्णालय, लोणावळा ता. मावळ जि. पुणे
८. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती (आरोग्य ३अ)